**“आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत MSRIP-I अंतर्गत EPC ६ रिद्धपूर लेहगांव तिवसा अंजनसिंघी धामणगाव देवगाव यवतमाळ रा.मा. ३०० ची सुधारणा करणे (कि.मी. ४४/३०० ते ५६/२५०, ५८/१०० ते ८२/१५०, ८५/७०० ते १०८/३०० व धामणगाव वळण रस्ता कि.मी. ०/०० ते ६/५६०. ता. तिवसा, धामणगाव रेल्वे व बाभूळगाव, जि. अमरावती व यवतमाळ” या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - सुप्रमा -२०२२/प्र.क्र.२२५/रस्ते-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१.०२.२०२३

<u>**संदर्भ-**</u> शासन निर्णय क्र. एडीबी-२०१९/१/ सीआर - (२३) / नि-३ /दि. ०१.०३.२०१९ व दि. २१.०५.२०१९

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासननिर्णयाव्दारे “आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत MSRIP-I अंतर्गत EPC ६ रिद्धपूर लेहगांव तिवसा अंजनसिंघी धामणगाव देवगाव यवतमाळ रा.मा. ३०० ची सुधारणा करणे (कि.मी. ४४/३०० ते ५६/२५०, ५८/१०० ते ८२/१५०, ८५/७०० ते १०८/३०० व धामणगाव वळण रस्ता कि.मी. ०/०० ते ६/५६०. ता. तिवसा, धामणगाव रेल्वे व बाभूळगाव, जि. अमरावती व यवतमाळ” या कामास रु.२३३.८३ कोटी (रुपये दोनशे तेहतीस कोटी, त्र्याऐंशी लक्ष फक्त) अंदाजित खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

मुख्य अभियंता, कोकण तथा प्रकल्प संचालक (बा.स.प्र) सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग कोकण यांनी त्यांच्या दि.१८.१०.२०२२ रोजीच्या पत्राद्वारे प्रस्तावित प्रकल्पाची जास्त दराची निविदा स्विकृती तसेच बांधकामा दरम्यान कामाच्या व्याप्तीतील बदल, भाववाढ, सेवा वाहिनी स्थलांतरण, व वस्तू व सेवा कर, इ. कारणांमुळे प्रकल्प किंमतीत झालेली वाढ विचारात घेऊन सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

त्यानुसार सदर कामाच्या रु. २७६.४८ कोटी (रुपये दोनशे शहात्तर कोटी, अठ्ठेचाळीस लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत MSRIP-I अंतर्गत EPC ६ रिद्धपूर लेहगांव तिवसा अंजनसिंघी धामणगाव देवगाव यवतमाळ रा.मा. ३०० ची सुधारणा करणे (कि.मी. ४४/३०० ते ५६/२५०, ५८/१०० ते ८२/१५०, ८५/७०० ते १०८/३०० व धामणगाव वळण रस्ता कि.मी. ०/०० ते ६/५६०. ता. तिवसा, धामणगाव रेल्वे व बाभूळगाव, जि. अमरावती व यवतमाळ या कामास **रु. २७६.४८ कोटी (रुपये दोनशे शहात्तर कोटी, अठ्ठेचाळीस लक्ष फक्त)** इतक्या किंमतीस खालील अटीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपद्धती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार

समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी विभागाची राहील.

२) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी विभागाची राहील.

३) सदर प्रकल्प काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतूदीच्या मर्यादित पूर्ण करण्यात यावी.

४) सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपदधतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे कोणतीही अनियमितता होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना शासनाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही वा अशी कोणतीही सहमती/मान्यता शासनाने प्रस्तूत प्रकल्पाबाबत दिलेली नाही.

५) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रिय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रिय अनियमिततेस मान्यता गृहित धरली जाणार नाही.

२. प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मूळ प्रशासकीय मान्यता व सुधारित प्रशासकीय मान्यता यांचा तुलनात्मक तक्ता खालीलप्रमाणे आहे:-

| **अ.क्र** | **बाब** | **प्राप्त प्र.मा. नुसार किंमत** | **प्रत्यक्षात कार्यान्वीत केल्यानुसार किंमत** | **निव्वळ वाढ** | **प्र.मा.प्राप्त किंमतीच्या तुलनेत टक्केवारी %** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | Civil Cost | १६६.९७ | १८२.७२ | १५.७६ | ९.४३% |
| **२** | Royalty Charges | २.८८ | ६.१७ | ३.२९ | ११४.२४% |
| **३** | Maintenance Charges | ४.१७ | ४.११ | - ०.०६ | १.४४% (बचत) |
| **४** | Environmental Management Plan | ०.०८ | ०.०८ | ०.०० | ०.००% |
| EPC Cost (Total Civil Cost Excluding GST) | | १७४.१० | १९३.०८ | १८.९८ | १०.९० % |
| **५** | GST | २०.०५ | २७.१० | ७.०५ | ३५.१६% |
| **६** | Contingencies Charges | ८.७० | ०.३६ | -८.३४ | -९५.८६% (बचत) |
| **७** | Price Escalation | ८.७१ | २०.७३ | १२.०२ | १३८% |
| **८** | Supervision Charges | ३.४८ | १.१२ | -२.३६ | -६७.८२% (बचत) |
| **९** | Road Safety | ०.८७ | ०.०० | -०.८७ | -१००% (बचत) |
| **१०** | Rehabilitation and resettlement | ०.४८ | ०.७४ | ०.२६ | ५४.१६ % |
| **११** | Utility Shifting, Tree Cutting | १.६२ | १५.४० | १३.७८ | ८५०.६१% |
| **१२** | Interest during const. | १५.५३ | १७.६२ | २.०९ | १३.४५% |
| **१३** | Commitment charges | ०.२९ | ०.३३ | ०.०४ | १३.७९% |
| | **एकुण** | **२३३.८३** | **२७६.४८** | **४२.६६** | **१८.२४%** |

३.  सदर कामावरील खर्च कामावरील खर्च (०१) (०२) आशियाई विकास बँकेच्या कर्जसहाय्यातून रस्ते व पुलांची बांधकामे (राज्य हिस्सा ३० टक्के) (कार्यक्रम) (५०५४ ५२८९) ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४.  या कामावरील खर्च सुधारित अंदाजित खर्चाच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त खर्च होणार नाही या बाबीची जबाबदारी मुख्य अभियंता, कोकण तथा प्रकल्प संचालक (बा.स.प्र) सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग कोकण यांची राहील.

५.  सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौ.सं.२८८/२०२२/१४३३ दि.०२.१२.२०२२, व व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक दि.१३ जानेवारी, २०२३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.  सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२११६४३२३७११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GIRIBUWA LALEETAGOURI

Digitally signed by GIRIBUWA LALEETAGOURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=5bbfcc0ab611e512e681dec8a119d52ad56ce55fc27335f4a7e1f01afea65752, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C1486B2EE3003A0B1BC0B86E8678FC8539AB726CD03BD45E6C07178746085B5, cn=GIRIBUWA LALEETAGOURI
Date: 2023.02.21 16:50:05 +05'30'

**( ललितागौरी गिरीबुवा )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) मुंबई
२. महालेखापाल-१,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
३. महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखापरीक्षा) नागपूर.
४. महालेखापाल-२,महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. वित्त विभाग, (व्यय-११) मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. मुख्य अभियंता, कोकण तथा प्रकल्प संचालक (बा.स.प्र) सा.बां.प्रा.विभाग, कोकण
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती
९. कार्यकारी अभियंता, विशेष प्रकल्प विभाग, अमरावती
१०.निवडनस्ती कार्यासन रस्ते-५ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.